प्रधानमंत्री मातृ वंदना या योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षाचा अनुसुचित जाती (SC) या घटकाचा राज्य हिश्याचा ४०% निधी वितरित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

सार्वजनिक आरोग्य विभाग

शासन निर्णय क्रमांकः पुरमा-२०१९/प्र.क्र.३१९/कु.क.

गो. ते. रुग्णालय संकुल इमारत, १० मजला, ए विंग,

मंत्रालय, एल.टी.मार्ग, मुंबई -४०० ००१.

तारीखः  ११ मार्च, २०२०

वाचा -

१) आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे जा.क्र. प्रमंमावंयो/९५९२४-२५/२०१९, दि. २१.९.२०१९

२) सार्वजनिक आरोग्य विभाग मंत्रालय यांचे शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/ प्र.क्र.१२२/अर्थसंकल्प,दि.७.१.२०२०

३) केंद्र शासनाचे पत्र क्र.१५/२८/२०१७-PMMVY , दि.३१.१२.२०१८.

४) केंद्र शासनाचे पत्र क्र.१५/२८/२०१७-PMMVY , दि.२७.२.२०१९.

५) केंद्र शासनाचे पत्र क्र.१५/२८/२०१७-PMMVY , दि.२०.३.२०१९.

६) केंद्र शासनाचे पत्र क्र.१५/२८/२०१७-PMMVY , दि.२७.०३.२०१९.

प्रस्तावना :-

प्रधानमंत्री मातृ वंदना ही केंद्र पुरस्कृत योजना सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात राज्यात कार्यान्वित केली आहे. या योजनेच्या अंमलबजावणीसाठी केंद्र शासनाकडून प्राप्त होणारा निधी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांच्या नावे उघडण्यात आलेल्या ESCROW ACCOUNT मध्ये थेट जमा होतो व प्राप्त निधीच्या ४०% एवढा निधी राज्य हिश्यापोटी योजनेस उपलब्ध करुन दिला जातो.

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात योजनेच्या अंमलबजावणीसाठी केंद्र शासनाकडून संवर्ग निहाय निधी (सर्वसाधारण, अनुसुचित जाती व अनुसुचित जमाती घटकासाठी) प्राप्त झाला आहे. यामध्ये अनुसुचित जाती (SC) या घटकासाठी पहिल्या, दुसऱ्या, तिसऱ्या व चौथ्या हप्त्याचा असा एकूण रु. १४,६८,२०,४३२/- (रुपये चौदा कोटी अडुसष्ट  लक्ष  वीस हजार चारशे बत्तीस फक्त) एवढा निधी राज्यास प्राप्त झाला असून  सदर निधी ESCROW ACCOUNT मध्ये जमा झालेला आहे. या निधीस अनुरुप असा राज्य हिश्याचा ४०% नुसार

रु.९,७८,८०,०००/- एवढा निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. परंतु अनुसुचित जाती (SC) या सवंर्गासाठी विभागात स्वतंत्र लेखाशीर्ष उपलब्ध नसल्याने प्रथमत: नवीन लेखाशीर्ष उघडण्यात आले. तद्नंतर राज्य हिश्यापोटी द्यावा लागणारा ४०% प्रमाणे रु.९,७८,८०,०००/- (रु. नऊ कोटी अठ्ठयांतर लाख ऐंशी हजार फक्त) एवढा निधी डिसेंबर, २०१९ च्या अधिवेशनात पुरक मागणीद्वारे मंजुर करुन घेण्यात आला आहे. सदर निधी प्रधानमंत्री मातृवंदना योजनेसाठी वितरित करण्याचे प्रस्तावित आहे.

## शासन निर्णय:-

प्रधानमंत्री मातृवंदना योजनेची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षाचा पहिल्या, दुसऱ्या, तिसऱ्या व चौथ्या हप्त्याचा अनुसुचित जाती (SC) या घटकासाठी राज्य शासनाचा ४०% नुसार रु.९,७८,८०,०००/- (रु.नऊ कोटी अठ्ठयांत्तर लक्ष ऐंशी हजार फक्त) एवढा निधी सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षात वितरित करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

२. उपरोक्त निधीसाठी मुख्य प्रशासकिय अधिकारी, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८.७.२०१९ सोबतच्या परिशिष्ठामधील अटी व शर्तीची पूर्तता केलेली आहे. तसेच या शासन निर्णयान्वये वितरीत केलेले अनुदान योजनेच्या अंमलबजावणीसाठी उघडण्यात आलेल्या Escrow Account मध्ये जमा झाल्यानंतर लाभपात्र लाभार्थ्यांच्या खात्यात थेट जमा करण्यात येणार आहे असे प्रमाणित करण्यात यावे.

४. सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षात "मागणी क्र. आर-१, २२११- कुटुंब कल्याण, ७८९ अनुसुचित जाती उप योजना, (०१) अनुसुचित जाती उप योजनेंतर्गत योजना, (०१) (०१) प्रधानमंत्री मातृवंदना योजना (अनुसुचित जाती उप योजना) (केंद्र पुरस्कृत योजना) (राज्य हिस्सा ४० %) (कार्यक्रम) (२२११ १४५९), ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या तरतूदीच्या मर्यादेत खर्च करण्यात यावा.

५. सदर खर्च हा सशर्त असून केलेल्या खर्चाचे विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र व योजनेच्या प्रगतीचा अहवाल केंद्र व राज्य शासनास विहित प्रपत्रात केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार वेळोवेळी पाठविण्यात यावा. तसेच सदर निधी हा सन २०१९-२०२० या आर्थिक वर्षात खर्च

करण्यात यावा. प्रधानमंत्री मातृ वंदना या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी प्राप्त झालेल्या अनुदानापेक्षा अधिक खर्च होणार नाही याची दक्षता संबंधित कार्यालयाने घ्यावी.

६. प्रधानमंत्री मातृवंदना योजनेतील अनुसुचित जाती प्रवर्गासाठीचा निधी हा वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचना, आदेशातील अटींचे पालन करण्याच्या अधिन राहुन तसेच या योजनेचा निधी अनुसुचित जाती व नवबौध्द प्रवर्गासाठीच खर्च होईल, यांची दक्षता संबंधित कार्यालयाने घ्यावी. या योजनेतील लाभार्थ्यांची माहिती MPSIMS वर अद्यावत करण्यात यावी. ही माहिती अद्ययावत केली नसल्यास ती अद्ययावत करुन पुढील निधी वितरणाच्या वेळीस सादर करण्याच्या अटीच्या अधिन राहुन मान्यता देण्यात येत आहे.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.८.७.२०१९ व अनौपचारीक संदर्भ क्र. ७९ /२०२०/व्यय-१३, दि.०७.०२.२०२० तसेच सामाजिक न्याय विभागाचा अनौ संदर्भ क्र. १६/सा.न्या.वि.स., दि. २४.१.२०२० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१११५०४००९४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ujwala Arun Ransing

Digitally signed by Ujwala Arun Ransing
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a7788b3b31e2d9269bcbfd9588a6ee4771341780133d295a56dd4ef476977773, serialNumber=3b8f98f1c182bf458a4deee399a7241b5044aeb09c097bc6d28b58709fe8ef0d, cn=Ujwala Arun Ransing
Date: 2020.03.11 18:04:58 +05'30'

**(उज्वला अ. रणसिंग)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)/ लेखापरीक्षा), १/२, मुंबई/ नागपूर
२. अधिदान व लेखा कोषागार, मुंबई.
३. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
५. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
६. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे
७. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई

८. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
९. वित्त विभाग व्यय -१३ / अर्थसंकल्प -९, मंत्रालय, मुंबई.
१०. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प / लेखा), मंत्रालय, मुंबई
१२. निवड नस्ती (कु.क.)